# पुज्य रमणी गुरुजींचे फल वाचन

**तमिळ भाषेतील वाचनातून जे बोलले जाते ते नेमके काय असते याचा मराठी भाषेत नमुना सादर... E Book 108**

**सौजन्य एक नाडी ग्रंथ प्रेमी**


माता बहुला काकभुजंदर महर्षी रमणी गुरुजींच्या आश्रमातील पूजारूम

**दि. १ फेब्रुवारी २०१६ रोजी पुण्यात झालेल्या रमणी गुरुजींच्या काक भुजंदर महर्षींच्या जीव नाडीच्या वाचनात माझ्या ( शशिकांत ओक) जे म्हटले गेले ते सादर**



**पुज्य रमणी गुरुजी पुण्यात वाचन करताना**

**चेन्नईच्या पुर्व तांबरम उपनगरात त्याचा आश्रम आहे. त्यांच्या हातात काक भुजंदर (भृशुंड) महर्षींच्या ताड पट्ट्यांचे पॅकेट असते. त्यातून त्या दिवशी जमलेल्या व्यक्तींचे कथन येते. ते मोठ्या आवाजात केले जाते.**

॥ ॐ नमःशिवाय ॥

॥ शिवमयम् ॥

“हे बालक...! काही दैवी रहस्ये जाणून घेण्याकरिता तू भूमिवर आदळआपट करित राहिलास, थयथयाट करित राहिलास...! ती रहस्ये आम्हांकडून अक्षरशः खेचण्याचाही तू प्रयत्न केलास....! काय सांगू? पण बालका, हे तू जाणून अस की ह्या विश्वामध्ये जे म्हणून काही घटते आहे, ते केवळ आणि केवळ त्या विधात्याच्या शब्दामुळेच...! हा शब्द म्हणजे त्याचे लिखित आहे; तेच 'ब्रह्मलिखित' आहे. त्यासच आम्ही 'ब्रह्मलिपि' असे संबोधितो. ह्या विश्वात जे म्हणून काही अस्तित्त्वांत येते, ते केवळ आणि केवळ त्याच्या आज्ञेमुळेच हो...! ऐक, बालका...! जन्म-मृत्यू, आयुष्य नियती आणि मानवी जीवनाशी संबंधित तुझे प्रश्न, त्यांची उत्तरे... ही सारी सर्वोच्च रूपातील काही दैवी रहस्ये आहेत. ही सूक्ष्म रहस्ये तुझ्या-माझ्यासारख्यांच्या आकलनाच्या पलिकडे आहेत. आपण त्यांस कदापि समजून घेवू शकत नाही.... कदापि समजून घेवू शकत नाही.....

"परंतु एक खात्री मात्र देतो..! स्वतःमी काकभृशुंडी... तुला ही खात्री देतो, की ... येत्या काळांत ह्या देवी रहस्यांच्या बळाची महत्ता तुला अनुभवावयास मिळेल.... खचितच मिळेल...! अनुभवावयास म्हणून तू थांब, आणि त्या काळाच्या आगमनाची वाट पहा.... प्रतीक्षा कर... बहुधा तेंव्हाच, त्या येत्या काळांतच, तुझे सारे प्रश्न संपुष्टात येवून तुला आंतरिक मनःशांतिची प्राप्ती होवू शकेल. हे बालका...! ह्या काळाच्या चक्रासह मीही कित्येक प्रदक्षिणा केल्या आहेत. अनेकानेक युगांच्या पुनरावृत्त्यांचा मी स्वतःसाक्षी आहे. साक्षात् काळदेवाच्या हस्तांत स्थित असतांना मी 'काळ' पाहिला आहे, आणि जेंव्हा त्या काळाने अस्पर्धनीय गति धरली तेंव्हा मीही त्यासह धाविलो होतो. हे अबोधा...! तू त्या भगवान श्री काकभृशुंडी महर्षींची जीवनाडी 'ब्रह्मलिखित नियतीची सोप्या प्रकारे उकल करा' असे आम्हांस म्हणतोस....! चल, मी तुझे प्रश्न सोडविण्याचा एक प्रयत्न करतो. पण बालका, तू हेही जाणून अस की तुझ्या प्रश्नांच्या संदर्भातील माझी उत्तरे ही माझ्या अभ्यासानुभवाची साक्ष असतील. असो! तू माझे म्हणणे ऐकून ते समजून घेशील अशी मी आशा व्यक्त करतो."

"हे बालका...! नाडीशास्त्र म्हणजे काही विनोद नव्हे, हे तू सर्वप्रथमत: जाणून अस. हा विनोदाचा किंवा विरंगुळ्याचा विषय नक्कीच नव्हे. संपूर्ण नाडीशास्त्र हे त्या सिद्धपुरुषांनी, साधु-तपस्वी आणि योगीजनांनी त्यांच्या अपार परिश्रमांमधून, कठोर

तपश्चर्यामधून आणि कष्टमय स्वसंयमनातून मिळविलेल्या अथांग त्रिकालज्ञानाचा एक भाग होय. लक्षात घे, नाडीशास्त्राबाबत जे काही म्हणून आजमितीस ज्ञात आहे, ते त्या सहृदय आणि दयाळु महात्म्या महर्षींनी आपणांस वाटून दिलेला केवळ एक छोटासा भाग होय. बालका..! त्या ज्ञानसागराचा एक थेंबमात्रदेखील अमृतासमान आहे; कारण त्या उपदेशास आचरणांत आणून आपण निरंतर आशिर्वादाच्या परमोच्च स्थितीस प्राप्त होवू शकतो. म्हणूनच नाडीशास्त्र हे परमेश्वरीय आशिर्वादाचे एक परम-सर्वोच्च स्वरूप म्हणविले जाते; आणि ते त्याहून दुसरे-तिसरे काहीही नव्हे. बालका, लक्षात घे! ह्या दिव्य दैवी शास्त्राबद्दल आपण केवळ इतकेच जाणू शकतो. ह्याविषयी जाणून घेण्यासारखे ह्यापेक्षा अधिक इतर काहीही नाही, रे..! ह्यापेक्षा अधिक इतर काहीही नाही.."

"हे बालका... काही गोष्टी जाणून घेण्याकरिता आपणांस आपले मन त्या दिशेने पसरवावे लागते... तेंव्हाच आणि केवळ तेंव्हाच आपण त्या गोष्टींबद्दलचे ज्ञान ग्रहण करण्यास पात्र होतो, तरीही; अशी पात्रता मिळवूनही,,, काही गोष्टी जाणून घेणे हा मानवी मनाच्या आवाक्याच्या पलिकडील विषय होय. जाणून अस, जसा चंद्र हा 'मना'चा सूचक आहे. तसाच तो 'माते'चाही सूचक आहे. काही विशिष्ट गोष्टी जाणून घेण्याकरिता सुयोग्य मानसिक अवस्था आणि आदिमाया प्रकृतीमातेचे अमाद आशिर्वाद हे दोन्ही 'एकाच वेळी प्राप्त असणे आवश्यक असते, ह्याविषयी तू अजिबातच शंका बाळगू नयेस, हाच मानसिक अवस्था सुचविणारा 'चंद्र' तुझ्या नावाच्या प्रथम भागाचाही सूचक आहे. तर तुझ्या नांवाच्या दुसरा भाग हा खलाचा सूचक आहे. (तमिळ भाषेमध्ये 'कान्त 'क्कल् / हिंदी भाषेमध्ये सिल 'बट्टा मराठी भाषेमध्ये खलबत्त्यातील खल'). ह्या खलावर काहीही कितीही कुटले, तरी त्याच्यात काहीही शिरत नाही. तो स्वतःअपरिवर्तनीयच असतो, तोच गुण तुझ्यात अजूनदेखील आहे. तू तर कोणत्याही उपदेशाने अजिबात उपरत न होता, न बदलता.... स्वतच्च ठरविलेल्या स्वतच्याच एका विशिष्ट मार्गावर नेहमीच क्रमरत असतोस नां...असो...!"

"हे बालका.. । वृक्षाची वाढ ऊर्ध्वदिशेस जरी होत असली, तरी वृक्षाचे बीज हे नेहमी भूमिच्या खालीच स्वतःचे स्थान निर्माण करित असते; अवकाशात नव्हे, तशीच तुझी कथाही असावी. परंतु गगनमार्गाशी तथा अंतरिक्षातील वायुयानासंदर्भातील शास्त्राशी संलग्न असलेल्या एका शासकीय यंत्रणेमध्ये तू नियुक्त होतास. जेथून एखादा पवनरथ उत्प्लावन बळाच्या सहाय्याने स्वतःस गगनमार्गात झोकून देवून स्वतःचा मार्ग प्रशस्त करतो, तेथे तळ-सपाटीवर तुझे कार्यस्थान असे. त्या यंत्रणेत तुझी कार्यशाखा

भूमिस्थित व्यवस्थापकाची होती. तेथील तुझ्या कार्यकाळांतच तुला आकाशीय अभिलेखांच्या विषयात अभिरुची निर्माण झाली, आणि ह्या तुझ्या अभिरुचीकरिता तू स्वतःच्या सर्व मर्यादा तोडून टाकून स्वतःचा असा एक मार्ग प्रशस्त केलास. त्या अनुषंगाने पुढे वाटचाल करित असतांनाच, साऱ्या थोरा-मोठ्या ऋषीमुनींना मानवंदना देत त्या तुझ्या प्रवासात... तुझ्याकडून ह्या दैवी शास्त्राबद्दल एक सामाजिक जागृतीही निर्माण केली गेली. बालका... तुझा तो सारा प्रवास मी फार सूक्ष्मतेने अवलोकिला आहे. तुझ्या आतापर्यंतच्या प्रगतीने मी समाधानी नाही असेही नाही. असो...! येथून पुढील काळाकरिता माझी तुझ्यासाठी काही सुचवणी आहे. कृपा करून लक्षपूर्वक ऐक."

"हे बालका...! 'ऋषीमुनींना, महर्षींना त्या परमदिव्य प्रखर तेजाचे दर्शन कसे काय होवू शकते? त्यांच्यासम ज्ञानाची प्राप्ती कशी होवू शकेल?', असेही तू विचारतोस. हे अबोधा...! साऱ्या थोरा-मोठ्या ऋषीमुनींनी, महर्षींनी ज्ञानयज्ञामध्ये स्वतःची अक्षरशः आहुती दिली आहे. त्या यज्ञात जळन स्वतःची पुरती राख झाल्यानंतरच नव्हे कां त्यांना त्या परमदिव्य प्रखर तेजाचे दर्शन होवू शकले? ह्यावर थोडा विचार कर पाहू? एक सांग बरे, कां तू सारखा-सारखा त्या परमदिव्य प्रखर तेजाकडे खेचला जातोस? कां म्हणून तुझ्या मनामध्ये ह्या साऱ्या दैवी शास्त्रांविषयी अभिरुची उत्पन्न होते? कां बरे ह्या विषयाबद्दल तुला ओढ आणि आपुलकी आहे? हे सारे काही अकारणतःनिश्चितच नव्हे हो...! लक्षात घे, तुझ्या जन्मांतरीचे एक परमपवित्र बंधन हेच ह्या साऱ्यामागचे एकमात्र कारण आहे. काही विषयांबाबत जाणून घेण्याची तुझ्या त्या जन्मातील ती अनुरक्ती, ती जिज्ञासा... तीच आजही, ह्या जन्मातही... जसा जो तू आहेस तसे त्या तुला घडविण्यास कारणीभूत आहे. हे बालका...! 'तारक' नांवाच्या शक्तीने तुझ्या आत्मज्योतीस धरून ठेवले आहे; तुला तारलेले आहे. मी जसे पाहतो आहे, तसे ही 'तारक' नामक शक्ती आज तुझ्या आधारचक्रामध्ये आहत झालेली आहे. तेथेच ती ब्रह्मप्रकाशामध्ये स्थित आहे."

"आजच्या आधीही तू नाडीशास्त्राविषयीचे तुझे प्रश्न घेवून अनेक ठिकाणी गेलेला आहेस. तुझ्या मनांत शास्त्राविषयी अनेक संदेहही उत्पन्न होवून गेलेले आहेत; अनेक प्रश्नही निर्माण होवून गेलेले आहेत. नाडीशास्त्र बरे की वाईट हाही प्रश्न तुझ्या मनांत डोकावून गेलेला आहे. ह्या शास्त्राचे महत्त्व ते काय, अन् त्याहीपुढे मुळात ह्या शास्त्राचे मूळ' आणि 'कूळ' काय... येथपर्यंत तुझे सारे प्रश्न येवून ठेपले आहेत. तसे पाहता तू ह्या शास्त्राची सर्वप्रकारे परिक्षा घेवून पाहिलेली आहेस, होय ना? अनेक विभिन्न प्रकारचे

अनुभवही तुझा गाठीशी आहेत. आणि तरीही... आणि तरीही ह्या शास्त्राविषयीचे तुझे कित्येक प्रश्न आजही अनुत्तरीतच आहेत. नाडीशास्त्र हे संपूर्ण शास्त्र आहे की नाही, असाही विचार । कधीकधी तू करून जातोस. हे बालका...! असले निरर्थक विचार करून तू स्वतःस अधिकाधिक ओझ्याखालीच ढकलतो आहेस, असे तुला किंचितही वाटत नाही काय? ऐक, बालका...! येत्या काळांत एका विशिष्ट व्यक्तीच्या नाडीग्रंथवाचनासाठी तू त्या व्यक्तीशी संपर्क साधशील... किंवा कदाचित ती व्यक्ती तुझ्याशी संपर्क साधू शकेल.”

"कदाचित... कदाचित त्या वेळी तुला हे उमग शकेल की ते जन्मांतरीचे पवित्र नाते... हे प्रश्न, ही उत्तरे... हा सारा तर निव्वळ एक दैवी खेळ होता. हे सारे जाणणे, ह्या अनुभवातून जाणे... हे तुझ्या नियतीनेच, तुझ्याही नकळत निर्धारित करून ठेवलेले होते... तर जी मी सांगतो आहे; ती हीच ‘ब्रह्मलिपी' हो...! नाडीशास्त्राची संपूर्णता ह्याच ठायी आहे. आणि हो बरे...! हे सारे त्याच त्या जन्मांतरीच्या एका परमपवित्र बंधनामुळे तुझ्यासह घटित होते आहे. ऐक बालका! काळाने अभूतपूर्व अशी गति धरली आहे. आता तो थांबविला जावू शकणार नाही. ह्या ओघातच अनेक वर्षे आली आणि तशीच गेली... असो! जे झाले, ते झाले... होवून गेले. “कोणत्या काळांत मी भविष्यकाळ कथन करण्याची क्षमता बाळगेन? त्यासाठी मी काय साधना करावी?” असे तुझे प्रश्न आहेत. हे जाणून अस, की आता हाती उर्वरित वर्षे फारशी नाहीत. अंतिम क्षण हा केंव्हा ना केंव्हा निकट यावयाचाच आहे. बालका, माझे म्हणणे अत्यंत लक्षपूर्वक ऐक. माझे कोणतेही विधान हे अनावश्यक आणि अनियत नाही; माझे विधान तुला अप्रियही असू नये. तू माझे म्हणणे समजून घेशील अशी मी आशा व्यक्त करतो.”

"हे बालका, तुझ्या अनेक पूर्वजन्मांपैकीच्या एका जन्मात... तू भगवान रुद्राच्या एका अशा परमभक्ताचा शिष्य होतास, जो भगवान रुद्राच्या शाश्वत आशिर्वादांच्या छत्रछायेखाली नित्यरूपी स्थित असतो. तो स्वत: त्या परमदिव्य अशा रुद्रप्रकाशात आपादमस्तक सुस्नात आहे. तो स्वत:ही एक मूर्तिमंत दिव्य प्रकाश आहे; स्वतःच एक अत्यंत प्रखर आणि विस्फोटक व्यक्तिमत्त्व आहे. ज्या आनंदाने हे सारे विश्वच अक्षरश: परवश होते, त्या साऱ्या अमर्याद आनंदाचा तोच एकमात्र उत्पत्तिकारक आहे. लक्षात घे! तो प्रत्यक्ष रुद्रस्वरूप'च आहे. असा तो... आता ह्या मर्त्य जगात अवतरलेला आहे. त्याने ह्यापूर्वीच एक मोठा ‘रुद्रयाग' आरंभिला आहे, जो अजूनही संपलेला नाही... तुझ्या एका पूर्वजन्मामध्ये तू त्याचा शिष्य म्हणून त्याचे आशिर्वाद प्राप्त केले होतेस. आज ह्या

जन्मात ज्या काही परिस्थितींना तू सामोरा जातो आहेस, त्या साऱ्या... केवळ आणि केवळ त्याच्या त्या आशिर्वादांच्या परिणामांचे स्वरूप मात्र आहेत. येथून पुढे ज्या ठिकाणी तुला पोहोंचून त्या अत्यधिक निर्णायकतेचे, त्या अत्यधिक निश्चायकतेचे दर्शन घ्यावयाचे आहे, त्या ठिकाणी पोहोचण्याकरिता आता तुला जीवन जगण्याचा एक सामर्थ्यपूर्ण मार्ग निवडावाच लागेल."

"हे बालका, तू कधी बैलगाडी पाहिली आहेस का? दोन बैल त्या गाडीला कसे ओढतात, कधी पाहिले आहेस? ते दोघे आजू-बाजूला उभे राहून एकमेकांना समांतर असे चालत असतात... गाडीवानाच्या आज्ञेनुसार. जर त्या दोघांच्या चालण्यामध्ये काही समन्वयच नसेल, तर ते गाडी ओढू शकणार नाहीत. नाही ना? जर त्यांना गाडी ओढावयाची असेल, तर ते एकमेकांशी स्पर्धा करू शकत नाहीत. आणि चालतांना ते सरळ, अगदी नाकासमोर पाहत असतात. अत्यंत एकाग्रतेने. मार्गक्रमण व्यवस्थितरीत्या करावयाचे असेल तर ते इकडेतिकडे पाहूच शकत नाहीत, होय नां? अगदी तसेच... हे बालका..! अगदी तसेच... त्याच एकाग्रतेने, त्याचा आज्ञाधारकतेने आता तू मी काय सांगतो ते ऐकावेस. तू दोलायमान होवू नकोस. तू इकडे-तिकडे भरकटू नकोस... अजिबात भरकटू नकोस!"

"ऐक, बालका...! भगवान सूर्यदेव जेंव्हा मेषराशीमध्ये संचरतील, आणि त्यांतही जेव्हा चैत्र पौर्णिमेचा दिन येवून ठेपेल, त्या दिवसापासून तुझे पूर्वजन्मीचे भाग्य फळू लागेल. तुला पुढेही थोरा-मोठ्या ऋषीमुनींचे, घोर तपस्वी महर्षींचे आशिर्वाद मिळणाचा योग अवश्य आहे. येत्या काळांत एका महात्म्याचा आशिर्वादपूर्ण दिव्य कटाक्ष तुझ्यावर पडून... त्या क्षणांपासून तुला आंतरिक मनःशांति अवश्य लाभेल. त्याहीपुढे जसे तुझ्या मनाची इच्छा आहे तसे, येत्या काळांत तुझ्या हाती अनुदान म्हणून थोरा-मोठ्या ऋषीमुनींचे दिव्य संदेश असलेले काही नाडीग्रंथ येतील. बालका...! त्या दिव्य संदेशांच्या बद्दल मी काय म्हणून सांगू तुला? अमृतासम अवीट गोडी असलेले त्यांतले ते शब्द अत्यानंद प्रसविणारे असतील. असे आनंददायी शब्द असलेले ते दिव्य नाडीग्रंथ तू हाती घेशील. आणि त्यांतील त्या दिव्याक्षरांचे ते दिव्य नृत्य तू तुझ्या नेत्रांसमोर अनुभविशील.... खचितच अनुभविशील...."

"बालका...! जन्मांतरीच्या त्या आशिर्वादांच्या परिणामस्वरूपात जे अनुभव तुला येथून पुढे यावयाचे आहेत, त्यांच्या पूर्तीकरिता आदिमाया प्रकृतिमाता तुला निश्चितच

सहाय्य करेल; तिचाही तुला आशिर्वादच आहे. तुझ्या मार्गामध्ये अनेक अडथळे आहेत ते काही पूर्वपापकर्माच्या पाठलागामुळे, तर काही बुद्ध्यानुसरणामुळे. तुझ्या कुळांत देखील ह्याचकारणे काही अडथळे उत्पन्न होवून तुझी संततीही तुझ्यापासून दुरावल्याप्रमाणे आहे.

आज तू सर्वस्वी एकटा उभा आहेस; बालका... आज तू सर्वस्वी एकटा उभा आहेस....! आणि खरेतर अजूनही वेळ गेलेली नाही. आता अजिबात भय बाळगू नकोस. जीवन जगण्याचा एकमात्र सामर्थ्यपूर्ण जो मार्ग आहे तो आता पुन्हा एकदा समोर उभा ठाकला आहे, त्या मार्गास तू निवड. ह्या मार्गाबद्दल मी तुला पूर्वीच सांगितले आहे... इतरेजनांनीही पूर्वीच तुला अनेकवार सांगितलेले आहे. तुझ्याकडून त्या मार्गावर चालणे नक्कीच शक्य होईल; अजिबात भय बाळगू नकोस. त्या मार्गावर आमचे अमृतमय दिव्य शब्द तुला सुलभतेची प्राप्ती निश्चितच करून देतील."

"अजून एक सांगतो रे माझ्या बालका...! 'मन्मथ' नामक ह्या तमिळ संवत्सराच्या अखेरीस; त्यातही शेवटच्या, म्हणजे फाल्गुन महिन्याच्या आत तुझ्या दृष्टोबरील मळभ दूर होवून तुझा दृष्टीकोनही स्वच्छ, स्पष्ट आणि सामर्थ्यधारणास पोषक होईल. तुझी मनस्थिती पालटून, मग मनाप्रमाणे शुभ घटना घडू लागतील, आता ती वेळ प्राप्त होतेच आहे, तर अजून एका रहस्याची उकल करतो. तुझ्या कुटुंबामध्ये काही न्यूनता आहेत, त्याविषयी... तुम्हां कुटुंबीयांमध्ये काही मतभेद आहेत; काही वाद आहेत. काही विषयांमध्ये अजिबात एकवाक्यता नाही. तर एकूणातच तुझ्या मनातील साया भय-भीतीचे निर्मूलन करण्याकरिता; तुझ्या कौटुंबिक मतभेदांची निवृत्ती करण्याकरिता आणि येत्या काळांत तुला प्राप्त होणार असणाऱ्या जीवन जगण्याच्या त्या सामर्थ्यपूर्ण मार्गाची निवड होण्यामध्ये येणाऱ्या विविध अडथळ्यांना दूर सारून सुलभता आणण्याकरिता पुढे एक परिहार सांगतो आहे. तुझ्या पुढील वाटचालीत सुलभता होण्याकरिता तो यथासांग करणे अत्यावश्य आहे."

"बालका, ऐक... परिहारार्थ म्हणून श्रीगणेशाच्या कोणत्याही एका मंदिरास तू जावेस. तेथे जावन त्या वरदायक गणपतीचे दर्शन तू घ्यावेस, त्यास नमस्कार अर्पावेस. त्याच्यापुढे दूर्वाहार ठेवून मग तो त्यास अर्पावास. त्यानंतर त्याच्यापुढे शिवफळ' म्हणविणाऱ्या त्रिनेत्रधारी नारळाचे बरोबर दोन भाग होतील असे ते फोडावेस. त्या दोन्ही भागांतून तूप घालून त्यां दोहों भागांचे त्याचे दिवे प्रज्वलित करून गणपतीसमोर

ठेवावेस, एवढे करून त्यानंतर त्यास पंचप्रदक्षिणा घालाव्यात, तशा घालून तु पुन्हा त्याचे समोर या बैस, पुन्हा दर्शन ध्यास आणि पोजान का होईना, त्यासमोर उभे रहावेस. हा विधी सांगितलेप्रमाणे करशील, तर तुझ्या कुटुंबातील, तुझ्या कुळातील साऱ्या दोषांची निवृत्ती अवश्य होईल, अवश्यमेव तुझ्या कुटुंबातील मतभेद तथा बाद इत्यादि संपणे शक्य होईल, एवढेच नव्हे, ह्याचसह तुझ्या मातुल कुळामध्ये अनेक पिढ्यांपासून चालत आलेल्या एक विशिष्ट शापातून तुझ्या मातुलकुळाची निवृत्तीदेखील याच परिहार-विधीमुळे होईल."

“येणारा काल उत्तमच आहे. अरे, खात्री बाळग! मी स्वतःकाकभुशुंडी सांगतो आहे ना? येत्या चैत्रपौर्णिमेच्या पुढील काळात तू पूर्णबळाची प्राप्ती करून घेवून... त्यापुढील येत्या चार वर्षामध्ये शक्तीबळाचीही प्राप्ती करशील, तुझ्या ह्या आयुष्कालाची कीती दूरवर पसरलेली असेल' असा जो आशिर्वाद तुला प्राप्त आहे, तो कधीही असफल होणार नाही, हेही तू पाहशील. आशिर्वचने कधीही विफल जात नसतात हे तू अनुभविशील, नक्कीच अनुभविशील! आणि येथून पुढे... भगवान अगस्त्य महर्षीं, भगवान भृगु महर्षी ह्यांनी पूर्वीच जी काही जी बीजे रोवून ठेविलेली आहेत. ती उगवितांना आता तू पहा... ती बीजे कशी आधार धरतात, कशी संपूर्णतेकडे, प्रखर प्रकाशाकडे वाटचाल करतात, ते तू स्वतःसाक्षी होवून पहा... तुझ्या पुढील वाटचालीला तुला तीच सहाय्यकारी ठरतील."

त्याचसह येत्या काळाच्या ह्या अथांग प्रकाशमय ओघात एका पवित्र नदीतटावर एक अत्यंत सुखदायक घटना घडण्यासाठी तुझ्या साक्षीची वाट पाहत आहे. तीस कारणीभूत होवून सुखी होण्याचा योगही तुला आहे. ही तीच घटना आहे, ज्यासंदर्भात मी ह्या प्रस्तुत ग्रंथवाचनांतूनच तुला सूचितही केले आहे. तीच घटना तुझ्या सुखाचा आधार आहे, हेही मी तुला सांगितले आहे. मी जे काही सांगितले. ते सारे ह्या भूमातेच्या संपूर्ण साक्षीनेच सांगितले आहे. हेच होवू घातलेले भवितव्य आहे, आणि ते अवश्यमेव घडेल. बालका!

जीवन जगण्याचा त्या एकमेवाद्वितीय सामर्थ्यपूर्ण मार्गावर स्थित हो... तुला त्या मार्गावर कधीही अडथळे येणार नाहीत रे... कधीही अडथळे येणार नाहीत...!"

"बालका... केवढे रे बोलावयास लावतोस...! हे सारे मी कां बोलतो आहे. माहिती आहे का रे तुला...? खरे तर तू ह्यावर विचार करावास. तुझ्या मनांत कदाचित ह्या गोष्टी

असतीलही - असावयास हव्यात. बालका, तुझ्या गुरुच्या विधानाची तुझ्याकडून अवहेलना केली गेली आहे... जाणता-अजाणता तू त्याचा निरादर केलास, अपमान केलास... तुझ्या मनांत त्याच्याविषयी; तुझ्या गुरुविषयी काही प्रश्न आहेत... स्पष्ट सांगावे, तर काही शंका आहेत... ह्या साऱ्या अडथळ्यांना दूर सारून तू त्याला संपूर्णतः शरण जा... आनंदाने शरण जा... स्वतःस त्याला अर्पण कर... लक्षांत घे, असे केल्यानंतर तुझे कोणतेही प्रश्न कधीही अनुत्तरीत राहणार नाहीत... कोणतेही प्रश्नच राहणार नाहीत...! अस्तु...!"

॥ शुभम् ॥



रमणी गुरुजी आणि काक भुजंदर महर्षी यांचा जन्मदिवस दरवर्षी एप्रिल महिन्यात तांबरम येथील अरुल कूडम येथे साजरा केला जातो. हा दिमाखदार सोहळा पाहण्यासाठी देश-विदेशातील भाविक उपस्थित असतात.




आश्रमासमोरील मंडपात भजन गायन आणि गोसेवा केली जाते. विवाह सोहळ्यासाठी नंदी पालखीत स्वार होतो. नंतर शेकडो साधूंना १२ प्रकारचे खाद्यपदार्थांचे अन्नदान केले जाते.



